CN..3

113400001

४८

सूचना योजना -
वित्तीय अधिकार प्रदान करण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
निर्णय क्रमांक: विअप्र-१०८७/[३०५]/कोषागारे-६,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २१ जून, १९८८.

वाचावे :- [१] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसजीएस-१०८५/२/१८[र. व का.], दिनांक १५ मार्च, १९८५.
[२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: एसजीएस-१०८७/२/१८[र. व का.], दिनांक २४ सप्टेंबर, १९८७.
[३] शासन प्रस्ताव, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसजीएस-१०८७/२/१८ [र. व का.], दिनांक ५ ऑक्टोबर १९८७.

निर्णय :- सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १५ मार्च १९८५ च्या शासन निर्णयान्वये शासकीय कर्मचा-यांची क्षमता वाढावी म्हणून शासकीय कर्मचा-यांनी/अधिका-यांनी शासनाला केलेल्या मौलिक सूचनांबद्दल त्यांना रोख बक्षीस देण्याबाबतची योजना शासनाने मंजूर केलेली आहे.

या प्रयोजनासाठी नेमण्यांत आलेली केंद्रिय समिती मौलिक सूचनांचे परीक्षण करते व रोख बक्षीसे मंजूर करते व बक्षीसाची रक्कम मंजूर करण्याबाबतचे औपचारीक आदेश सामान्य प्रशासन विभागाकडून निर्गमित करण्यांत येतात.

केंद्रिय समितीने मंजूर केलेली बक्षिसाची रोख रक्कम संबंधित शासकीय कर्मचा-याला/अधिका-याला देण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यापूर्वी सामान्य प्रशासन विभागाला प्रत्येक प्रकरणी वित्त विभागाची मंजूरी घेण्याची आवश्यकता पडू नये तसेच यामध्ये होणारा कालापव्यय टळावा म्हणून बक्षिसाची रोख रक्कम सामान्य प्रशासन विभागाने मंजूर करण्यास त्या विभागाला संपूर्ण अधिकार प्रदान करण्याबाबतचा सामान्य प्रशासन विभागाचा दिनांक ५ ऑक्टोबर १९८७ चा प्रस्ताव शासनाने नेमलेल्या वित्तीय अधिकार प्रदान समितीकडे शिफारशीसाठी पाठविण्यांत आला होता. वित्तीय अधिकार प्रदान समितीने सदर प्रस्ताव स्विकारण्याबाबत शासनाला शिफारस केलेली आहे व ती शिफारस शासनाने मान्य केलेली आहे.

म्हणून शासन असे आदेश देत आहे की शासनाने मंजूर केलेल्या "सूचना योजनेनुसार" केंद्रिय समितीने पात्र ठरविलेल्या प्रकरणामध्ये संबंधित शासकीय कर्मचा-याला/अधिका-याला सदर समितीच्या शिफारशीप्रमाणे बक्षिसाची रोख रक्कम मंजूर करण्याबाबतचे पूर्ण अधिकार सामान्य प्रशासन विभागाला खालील अटींच्या अधीन राहून देण्यांत येत आहेत.

१] संबंधित शासकीय कर्मचारी/अधिकारी ज्या शासकीय कार्यालयांत काम करीत असेल त्या शासकीय कार्यालयाच्या आहरण व संवितरण अधिका-यांनी प्रदानाचे देयक तयार करावे व बक्षिसाची रोख रक्कम संबंधित शासकीय कर्मचा-याला/अधिका-यास अदा करावी.

कृ.पा.म.

२] याबाबतचा खर्च संबंधित शासकीय कर्मचारी/अधिकारी ज्या शासकीय कार्यालयांत काम करीत असेल त्या शासकीय कार्यालयाच्या "कार्यालयीन खर्च" खाती खर्ची टाकण्यांत यावा व तो त्या त्या वर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यांत यावा.

३] बक्षिसाची रोख रक्कम मंजूर करण्याबाबतचे औपचारिक आदेश काढण्यापूर्वी सामान्य प्रशासन विभागाला वित्त विभागाची पूर्व परवानगी घेण्याची आवश्यकता रहाणार नाही.

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग-२ मध्ये या अधिकार प्रदानासंबंधी यथावकाश अंतर्भाव करण्यांत येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

दि. द. परकी,
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग.

प्रत,

महालेखापाल [लेखा व अधिकारी]-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल [लेखा परीक्षा]-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता]-२, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल [लेखा परीक्षा]-२, महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, / निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
वरिष्ठ कोषागार अधिकारी, नाशिक/औरंगाबाद/नागपूर/पुणे/अमरावती,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, / सर्व उपकोषागार अधिकारी,
सामान्य प्रशासन विभाग-१८[र. व का. ], /मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभाग,
मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील
सर्व विभाग प्रमुख / सर्व प्रादेशिक कार्यालय प्रमुख / सर्व कार्यालय प्रमुख,
सर्व विभागीय आयुक्त / सर्व जिल्हाधिकारी,
सचिव, सामान्य प्रशासन विभाग १८ [र. व का. ],
सचिव, [लेखा व कोषागारे], वित्त विभाग,
राज्यमंत्री [वित्त] यांचे स्वीय सहाय्यक, /वित्तमंत्री यांचे खाजगी सचिव,
निवड नस्ती, कोषा-६, वित्त विभाग,
वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग-२, सुधारणा संग्रह, कोषा-६,
कार्यासन अधिकारी, व्यय-४, वित्त विभाग,
वित्त विभागातील सर्व अधिकारी.

**********